# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**राज्यातील आरटीओ कार्यालये दलालमुक्त करण्याबाबत**

**(१) १४१०० (२१-१२-२०१५). श्री.विनायकराव मेटे : तारांकित प्रश्न क्रमांक ३१८४ ला दिनांक १० मार्च, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील RTO कार्यालये दलालमुक्त करण्याची घोषणा माहे जानेवारी, २०१५ मध्ये राज्य शासनाने केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या आदेशाची अमंलबजावणी सर्व RTO कार्यालयाला लागू झाली आहे काय,

(३) असल्यास, बीड येथील RTO कार्यालयामध्ये आजही तेथील दलाल ग्राहकांचे कामे आणून आवाच्या सव्वा रक्कम घेऊन करत असल्याबाबत दिनांक १४ ऑक्टोबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत शासनाने या दलालांवर बंदी आणण्याकरिता व तेथील अधिकाऱ्यांशी दलालांचे असलेले संगनमत याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (११-०८-२०१७) :** (१) व (२) परिवहन कार्यालयातील अनधिकृत व्यक्तींच्या वावरात आळा घालण्यासाठी क्षेत्रिय परिवहन कार्यालयांना अशा स्वरुपाच्या परिपत्रकीय सूचना देण्यात आल्या आहेत.
(३) व (४) नागरिकांच्या सोयी सुविधांकरिता परिवहन कार्यालयामध्ये मार्गदर्शन कक्ष, एक खिडकी योजना, ऑनलाईन अपॉइटमेंट, ऑनलाईन फॉर्म्स व कायदेपद्धतीची माहिती या सेवा उपलब्ध करून दिल्या आहेत. तसेच कार्यालयात माहिती फलक देखील लावण्यात आले आहेत,
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**नवी मुंबईतील दिघा गावातील अनधिकृत बांधकामास जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत**

**(२) १४७११ (२८-०४-२०१६). श्री.नरेंद्र पाटील, श्री.सुनिल तटकरे, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव : तारांकित प्रश्न क्रमांक ११९९५ ला दिनांक ८ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबईतील दिघा गावातील पाडण्यात आलेल्या अनधिकृत इमारतीच्या बांधकामास जबाबदार असलेल्या एमआयडीसी, सिडको व महानगरपालिकेच्या अधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत माहे डिसेंबर, २०१५ च्या दुसऱ्या सप्ताहात मा.उच्च न्यायालयाने आदेश दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकरणी कोणत्या अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (१०-०८-२०१७) :** (१) हे खरे नाही.

तथापि, दिघा गावातील अनधिकृत बांधकामास एमआयडीसी, सिडको, नवी मुंबई महानगरपालिका अधिकाऱ्यांची काय भुमिका होती, हे तपासण्याचे आदेश मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेले आहेत.

(२) व (३) सदर गुन्हयाच्या तपासा दरम्यान एमआयडीसी, सिडको, नवी मुंबई महानगरपालिका अधिकाऱ्यांचा सहभाग आढळून आलेला नसल्याने त्यांच्यावर कारवाई करण्यात आलेली नाही.

---

**राज्यात बांधकाम व्यावसायिकांनी इमारतीच्या बांधकामासाठी सल्लागाराचे प्रतिज्ञापत्र अंतिम मानण्याचा निर्णय शासनाने घेतल्याबाबत**

**(३) १६३६८ (२९-०४-२०१६). श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात बांधकाम व्यावसायिकांनी इमारतीच्या बांधकामासाठी सल्लागाराचे प्रतिज्ञापत्र अंतिम मानण्याचा निर्णय शासनाने माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रतिज्ञापत्रात इमारत पुनर्विकासात सदनिकाधारकांवर अन्याय होऊ नये म्हणून कोणकोणत्या बाबींचा समावेश करण्यात आला आहे,

(३) तसेच, सदर निर्णयाची अंमलबजावणी प्रत्यक्षात केव्हापासून करण्यात येणार आहे ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०२-०८-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**उर्ध्व पैनगंगा प्रकल्प इसापूर (जि.हिंगोली) येथील मच्छिमारांना मत्स्यव्यवसाय या व्यवसायापासून वंचित ठेवल्याबाबत**

**(४) १९३२२ (११-०८-२०१६). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उर्ध्व पैनगंगा प्रकल्प इसापूर (जि.हिंगोली) पूर्ण होऊन सुमारे ३५ वर्षे होऊन या प्रकल्पामध्ये विदर्भ व मराठवाडयातील सुमारे ४५ गावांचा समावेश होऊन सदर गावे बाधित झाली आहेत, हे ही खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रकल्पबाधित गावातील विविध समाजातील लोक मासेमारी करून उपजिविका करतात परंतु प्रकल्पबाधित क्षेत्रातील बाहेरील लोकांना मच्छिमारी करण्याचा ठेका दिला जातो, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी चौकशी करुन शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०२-०८-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

उर्ध्व पैनगंगा प्रकल्पामध्ये मराठवाड्यातील ३५ गावे (हिंगोली जिल्हा) व विदर्भातील १९ गावे (यवतमाळ जिल्हा) अशी एकूण ५४ गावे बाधित झाली आहेत.
(२) उर्ध्व पैनगंगा प्रकल्प (इसापूर) जलाशय ठेक्याने देण्याचा अधिकार कृषि व प.दु.म. विभागाच्या शासन ज्ञापन क्रमांक :- मविम-२००९/प्र.क्र.१५४/पदुम-१२, दिनांक २८/०६/२०१० नुसार सदर जलाशय महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडे हस्तांतरीत झाले आहे. सदर जलाशयाचा महाराष्ट्र मत्स्याद्योग विकास महामंडळाकडून जाहीर निविदा मागवून ठेका देण्यात येतो. त्यामुळे महाराष्ट्रातील कोणतीही व्यक्ती जाहिर निविदेनुसार ठेका घेण्यास पात्र ठरते. मात्र सदर ठेका देताना स्थानिक मच्छिमारांना रोजगार पुरविणे, ठेकेदारावर बंधनकारक केले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक जिल्हयात डाळींब पिकावर बदललेल्या वातावरणामुळे रोगाचा प्रादुर्भाव झाल्याने पिके धोक्यात आल्याबाबत

**(५) १९५८७ (१६-०८-२०१६). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक ५२६६ ला दिनांक २४ मार्च, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **फलोत्पादन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक जिल्हयातील डाळींब पिकाला मागील काही वर्षातील वातावरणातील सततच्या बदलामुळे 'तेल्या' रोगाने ग्रासल्याने मालेगांव, सटाणा, कळवण व देवळा तालुक्यातील सुमारे दहा हजार हेक्टर डाळींब बाग शेतकऱ्यांचे नुकसान होत असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तेल्या रोग व त्यात दुष्काळाची भर पडल्याने नाशिक जिल्ह्यातील डाळींबाचे असलेले चाळीस हजार हेक्टरवरील डाळींब पीक धोक्यात आले असून तेल्या रोगावर प्रभावी उपाय अंमलात आणून या रोगाचा समुळ नायनाट करण्याबाबत तसेच, रोगाचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे.
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (०८-०८-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

मालेगाव, सटाणा, कळवण व देवळा तालुक्यातील काही क्षेत्रावर डाळींब पिकावर तेलकट डागाचा प्रादूर्भाव दिसून आला आहे.
(२) तेलकट डाग व मर रोगावरील नियंत्रणासाठी कृषि विभागाचे क्षेत्रिय अधिकारी, डाळींब संशोधन व तंत्रज्ञान प्रसारण केंद्र लखमापूर व महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी येथील शास्त्रज्ञ यांचे मार्गदर्शनाखाली मालेगाव, सटाणा, कळवण आणि देवळा तालुक्यात शेतकरी मेळावे घेवून, घडीपत्रिका, भितीपत्रिका, परिपत्रके, याद्वारे तसेच किमान पोर्टलद्वारे एसएमएस पाठवून व शास्त्रज्ञांमार्फत आकाशवाणी, ॲग्रोवन विशेष अंकाद्वारे तेलकट डाग नियंत्रणासाठी शेतकऱ्यांना मार्गदर्शन करण्यात येत आहे.

कीडरोग सर्वेक्षकांमार्फत क्षेत्रिय स्तरावर डाळींब बागांची प्रत्यक्ष पहाणी करुन कीड रोगांसंदर्भाचा डाटा ऑनलाईन एनसीआयपीएम, नवी दिल्ली पोर्टलवर अपलोड केला जातो. सदर कीड रोगाच्या डाटानुसार प्रत्येक आठवड्यात एनसीआयपीएम कडून प्राप्त तांत्रिक मार्गदर्शनाची ॲडवायझरी कृषि विभागाच्या क्षेत्रिय अधिकारी मार्फत मराठीत शेतकऱ्यांना देण्यात आलेल्या आहेत.

उन्नत शेती व समृध्द शेतकरी या मोहिमेंतर्गत दिनांक २५ मे ते ८ जून २०१७ या पंधरवड्यात मालेगाव, सटाणा व देवळा या तालुक्यातील गावांमध्ये बैठका घेवून डाळींब पिकावरील तेलकट डाग नियंत्रणाबाबत माहिती देण्यात आली आहे. तसेच घडी पत्रिकांचे वाटप करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात जेष्ठ नागरिकांच्या सर्वसमावेशक धोरणाची अंमलबजावणी होण्याबाबत

**(६) १९६०९ (१६-०८-२०१६). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.जयवंतराव जाधव, श्री.प्रकाश गजभिये, श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.जयदेव गायकवाड, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.अरुणकाका जगताप, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.शरद रणपिसे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक १७२३३ ला दिनांक २१ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाने राज्यातील जेष्ठ नागरिकांसाठी माहे डिसेंबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान आखलेल्या सर्वसमावेशक धोरणामध्ये नमूद केलेल्या १६ बाबींपैकी किती बाबींची प्रत्यक्षात अंमलबजावणी झाली आहे,

(२) असल्यास, उक्त बाबींच्या संदर्भातील जेष्ठ नागरिकांना माहिती होण्यासाठी कोणत्या माध्यमातून त्यांची प्रसिध्द करण्यात आली आहे,

(३) असल्यास, उपरोक्त बाबींचा लाभ संबंधित जेष्ठ नागरिकांना होतो किंवा नाही याचा आढावा घेण्यासाठी शासनाने यंत्रणा निर्माण केली आहे काय, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. राजकुमार बडोले (०२-०८-२०१७) :** (१) संबंधित विभाग/कार्यालयांकडून सर्व बाबींची अंमलबजावणी करण्यात येत आहे.

(२) याबाबत होर्डिंग, वर्तमानपत्रे व लोकराज्य मासिकातून प्रसिध्दी देण्यात आली आहे.

(३) शासन निर्णय दिनांक २६/०५/२०१६ अन्वये जेष्ठ नागरिक धोरणाची अंमलबजावणीबाबत आढावा घेण्यासाठी मा.मंत्री (सा.न्या.) व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत.

---

## राज्यातील एसटी बसस्थानकाची पुनर्बांधणी व नुतनीकरण करण्याबाबत

**(७) २०५८१ (१६-०८-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील एसटीची एकूण ५८८ बस स्थानके तर २५२ बस आगारांचे पुनर्बांधणी, नुतनीकरणांचा निर्णय एसटी महामंडळ करील असे आश्वासन मा.परिवहन मंत्री यांनी केल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील एसटी आगारांचे पुनर्बांधणी व नुतनीकरणाच्या प्रश्नाबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (२३-०८-२०१७) :** (१) होय.

टप्प्या टप्प्याने २०० बसस्थानकांचे काम करण्याचे आश्वासीत करण्यात आले आहे.

(२) राज्यातील राज्य परिवहन महामंडळाची आगारे व बसस्थानके यांची टप्प्या-टप्प्याने पुनर्बांधणी, दर्जावाढ, नुतनीकरण सन २००९-१० पासून राज्य परिवहन महामंडळाच्या स्वनिधीतून व शासनाच्या सर्वसाधारण योजनेतून तसेच बांधा-वापरा-हस्तांतरीत करा या माध्यमाद्वारे १०५ बसस्थानक / आगारांची कामे पूर्ण झाली असून, २१ ठिकाणची कामे प्रगतीपथावर आहेत.

५९ ठिकाणची कामे प्रस्तावित आहेत. उर्वरित बसस्थानके/आगारांची कामे आवश्यकतेनुसार व निधीच्या उपलब्धतेनुसार करण्याचे राज्य परिवहन महामंडळाच्या कार्यवाहीखाली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण-डोंबिवली महापालिकेच्या हद्दीतील सॅटीस प्रकल्पातील गैरव्यवहाराबाबत

**(८) २१३७३ (२४-०८-२०१६). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.हेमंत टकले, श्री.सुनिल तटकरे, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण-डोंबिवली महापालिकेच्या हद्दीतील कल्याण पश्चिमेकडील सॅटीस प्रकल्प महापालिकेकडे हस्तांतरीत झाल्यानंतर उत्पन्नाचा स्त्रोत म्हणून एका ठेकेदाराला ४४८३ चौ.मी. परिसरात एमएमआरडीएने निविदेद्वारे जाहिरात करण्याचा ठेका दिला, परंतु या ठेकेदाराने निविदेतील अटी व शर्तीनुसार महापालिकेला द्यावयाची रक्कम दिली नसल्याने महापालिकेचे कोट्यवधी रुपयांचे नुकसान झाल्याची बाब माहिती अधिकार कार्यकर्ते श्री.विजय मनीयाळ यांनी निदर्शनास आणली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निविदेतील अटी व शर्तीचे पालन ठेकेदार करीत नसल्याचे संबंधित महापालिका अधिकाऱ्यांच्या निदर्शनास गेली अनेक महिने येऊनही अधिकाऱ्यांनी या ठेकेदाराशी आर्थिक संगनमत करुन त्यांचेविरुध्द कोणतीही कारवाई केली नसल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर ठेका घेणारी कंपनी व व्यक्ती कोण आहे तसेच त्यांच्याशी निविदेद्वारे केलेल्या करारातील प्रमुख अटी काय आहेत,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०८-२०१७) :** (१) होय,

कल्याण रेल्वे स्थानक परिसरात स्थानक परिसर वाहतूक सुधारणा योजनेंतर्गत स्कायवॉकचे काम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या अर्थसहाय्यातून हाती घेण्यात आले होते.

सदर स्कायवॉक वापराकरीता खुला करण्यात आल्यानंतर त्यावरील जाहिरातीसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून मे.आयकॉन ॲडव्हर्टायझिंग या अभिकरणास ठेका देण्यात आला होता. या ठेक्याची मुदत दिनांक १३/१२/२०१३ रोजी संपुष्टात आली. तद्नंतरही सदर अभिकरणाकडून स्कायवॉकवर जाहिरात करण्यात येत असल्याचे आढळून आले असून दिनांक

१३/१२/२०१३ पासून सदर अभिकरणाने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण आणि कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेस भरणा करावयाची रक्कम अदा केलेली नाही.

(२) दिनांक १४/१२/२०१३ ते दिनांक १३/०६/२०१६ या कालावधीतील थकीत रक्कम निश्चित करुन ती संबंधित ठेकेदाराकडून वसूल करण्याची कार्यवाही महानगरपालिकेकडून प्रस्तावित आहे.

मात्र संबंधित ठेकेदाराच्या ठेक्याची मुदत संपुनही महानगरपालिकेकडून याबाबत कोणतीही कारवाई करण्यात आलेली नाही, ही वस्तुस्थिती आहे.

या प्रकरणी जबाबदार असलेल्या महानगरपालिकेच्या संबंधित अधिकाऱ्यांची चौकशी करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्याबाबत आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांना सूचित करण्यात आले असून महानगरपालिकेमार्फत प्रस्तुत प्रकरणाच्या चौकशीची प्रक्रिया सुरु आहे.

(३) मे.आयकॉन ॲडव्हरटायझिंग असे ठेका घेणाऱ्या कंपनीचे नाव आहे. सदर ठेक्यासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून निविदा प्रक्रिया राबविण्यात आली असून ठेकेदाराशी केलेल्या करारातील प्रमुख अटी पुढीलप्रमाणे आहेत :-

(i) निविदा प्रक्रियेत भाग घेणारी संस्था ही कंपनी ॲक्ट, १८७२ नुसार नोंदणीकृत असावी.

(ii) निविदाकाराचा टर्नओव्हर मागील ३ वर्षात १ करोडपेक्षा जास्त असावा.

(iii) भागीदारी संस्था असल्यास जास्तीत जास्त ३ भागीदार असावेत.

(iv) एखादी संस्था MMRDA ची थकबाकीदार असल्यास अशा संस्थेस सदर निविदा प्रक्रियेत भाग घेता येणार नाही.

(v) रक्कम भरण्यास उशीर झाल्यास निविदाकारास १८% वार्षिक दंड भरावा लागेल.

(vi) निविदा नाकारण्याचे हक्क हे MMRDA कडे राखून ठेवण्यात आले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उपप्रादेशिक परिवहन अधिकारी, जळगाव यांनी कंपनीच्या मूळ डिझाइनमध्ये बदल करून बेकायदेशिररित्या वाहन वापरत असल्याबाबत

**(९) २१५०३ (१६-०८-२०१६). श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.हेमंत टकले, श्री.सुनिल तटकरे, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जळगावचे उपप्रादेशिक परिवहन अधिकारी वापरत असलेली कार नं.एमएच १९ एक्यू ७८०० या गाडीमध्ये कंपनीच्या मूळ डिझाईन मध्ये बदल करुन, बेकायदेशीररित्या गाडीची लांबी वाढवून, ती लिमोझीन पध्दतीने केली असल्याच्या तक्रारी प्राप्त झाल्यामुळे, दिसेल त्या ठिकाणाहून सदरहू कार जप्त करण्याचे आदेश भरारी पथकाला दिल्याची बाब दिनांक १७ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार अशा प्रकारे परिवहन विभागाची कोणतीही परवानगी न घेता गाडीचा वापर करणाऱ्या व्यक्तीविरुध्द शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०४-०९-२०१७) :** (१) व (२) प्रादेशिक परिवहन कार्यालयातील अभिलेखानुसार क्र.एमएच-१९ क्यू ७८०० हे हयुदांई कंपनीची सोनाटा कार हे शासकीय वाहन नसून खाजगी व्यक्तीच्या नावे नोंदणी केलेले वाहन आहे. दूरचित्रवाहिनीवरील बातमीपत्रान्वये निदर्शनास आल्यावरून सदर वाहन तपासणीचे आदेश वायुवेग पथकास देण्यात आलेले आहेत. सदर वाहन रस्त्यावरील तपासणीत आढळून आलेले नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रायगड जिल्हयातील जमिनीचे दावे मोठ्या प्रमाणात प्रलंबित असल्याबाबत

**(१०) २१८९९ (१६-०८-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्हयातील दळी जमिनीचे दावे, महाराष्ट्र शासनाच्या १९७१ च्या ठरावाला अधिन राहुन, कायद्याच्या कलम ३/१ (७) नुसार निर्णित व्हायला हवे असताना माहे जानेवारी, २०१६ ते मार्च, २०१६ पर्यंत आदिवासींना वैयक्तिक अधिकार न देता सामुहिक वन हक्क म्हणुन देण्याचा कार्यक्रम झाल्याचे दिनांक ३१ मार्च, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन २०१५ मध्ये दळी जमिनीचे दस्त हे वैयक्तिक देण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासनाला यासाठी कायद्याप्रमाणे दळी जमिनींचे हक्क वैयक्तिक आणि स्त्रीसह दस्त करण्याची मागणी शोषित जन आंदोलनाने केली आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विष्णु सवरा (२९-०७-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

वनहक्क कायद्यांतर्गत कलम (१)(जी) नुसार रायगड जिल्हयामध्ये दिनांक १७ मार्च, २०१६ रोजी ४५२ प्लॉट मध्ये ७,०२१ दळीधारकांना दळी जमिनीतील आदिवासींना वैयक्तिक अधिकार न देता सामुहिक हक्कांचे वाटप करण्यात आले आहे.

(२), (३) व (४) होय, हे खरे आहे.

ब्रिटीश कालावधीत दळी जमिनीचे क्षेत्र एका समुहाला शेती कसण्यासाठी वाटप केलेले आहेत. त्यामध्ये प्रत्येक वाडीसाठी एक दळी नायक सरकारने निश्चित केला होता. त्यावेळचे दळी बुक व दळी यादी या अभिलेखावरुन वनहक्क कायद्यांतर्गत कलम ३(१)(ए) व (जी) नुसार रायगड

जिल्ह्यात दळी धारकांना व जे दळीधारक मयत आहेत त्यांच्या वारसांना एकूण ४५२ दळी जमिनीचे पट्टे (टायटलडीड) वाटप करण्यात आले आहेत.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**ठाणे महानगरपालिकेचे बनावट शिक्के आणि कागदपत्रे तयार करणाऱ्या विकासकावर फौजदारी गुन्हे नोंदविण्याबाबत**

**(११) २१९७१ (२४-०८-२०१६). श्री.रामहरी रुपनवर, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे महानगरपालिकेचे बनावट शिक्के आणि कागदपत्रे तयार करुन त्याआधारे मयतांचे बनावट मृत्यू दाखले तयार करणाऱ्या एका विकासकावर कापूरबावडी पोलीस ठाण्यात गुन्हा दाखल झाला असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून संबंधित विकासकावर फौजदारी गुन्हे नोंदविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (३१-०८-२०१७) :** (१) व (२) होय.

सदर प्रकरणी मृत्यू नोंदणी दाखले बनावट असल्याचे सकृतदर्शनी निदर्शनास आल्यामुळे संबंधिताविरुध्द गुन्हे नोंदविण्याबाबत ठाणे महानगरपालिकेने वरिष्ठ पोलीस निरीक्षक, कापुरबावडी पोलीस स्थानक यांना कळवले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कोल्हापूर जिल्हयातील आठ धरणांच्या प्रकल्पांना निधी उपलब्ध करण्याबाबत**

**(१२) २३२१० (२०-०८-२०१६). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोल्हापूर जिल्हयातील सोनुर्ले (ता.शाहूवाडी), झांबरे, काजिर्णे (ता.चंदगड), नागणवाडी (ता.भुदरगड), आंबेओहोळ, उचंगी, सर्फनाल (ता.आजरा), धामणी (ता.राधानगरी) ही रेंगाळलेली ८ धरणे पूर्ण करण्यासाठी आता मूळ किंमतीपेक्षा सात ते आठ पट अधिक निधीची आवश्यकता असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकल्पांना निधी देवुन स्वतंत्र अधिकारी नियुक्ती करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (१८-०८-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

सदर आठ प्रकल्पांची एकूण मूळ प्रशासकीय मान्यता किंमत रुपये २४४.८४ कोटी व मंजूर सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रु. १२९१.४४ कोटी इतकी आहे. या प्रकल्पांची एकूण अद्यावत किंमत रु. १५८८.२८ कोटी इतकी असून, मार्च २०१७ अखेर झालेला खर्च रु. ७३३.८६ कोटी वजा जाता संभाव्य उर्वरित किंमत रु. ८५४.४२ कोटी इतकी आहे.

(२) या प्रकल्पांना सन २०१७-१८ मध्ये एकूण रु. १९.४३ कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. तसेच या प्रकल्पाची कामे पुर्ण करणेसाठी जलसंपदा विभागाचे अधिकारी नियुक्त असल्यामुळे स्वतंत्र अधिकारी नियुक्त करण्याची कार्यवाही करण्याची आवश्यकता नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**पुणे परिवहन कार्यालयात एजंटकडून एकच डीडी अनेकांना विकला जात असल्याबाबत**

**(१३) २३३६८ (१६-०८-२०१६). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्ह्यातील पुणे आरटीओ कार्यालयात वाहनांच्या पसंती क्रमांकाला मोठी रांग लावणाऱ्या वाहन मालकाना हा क्रमांक घेताना आरटीओ कार्यालयाकडे जमा करावयाच्या रकमेबाबतचा एका विशिष्ट बँकेचा डीडी असावा याबाबत कोणतेही बंधन नसल्याने एजंटकडून एकच डीडी अनेकांना विकला जात असल्याचे प्रकार दिनांक २४ एप्रिल, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरील एजंटला दिलेल्या अनामत रक्कमेचा डीडी परत मिळविण्यासाठी वाहनमालकांनी अर्ज केला असता त्यांना आश्वासन देऊन त्यांची पिळवणूक केली जात असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, पसंती क्रमांकासाठी डीडीचा गोंधळ करणाऱ्या व नागरिकांची फसवणूक करणाऱ्या संबंधितांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) तसेच सदरील कार्यालयात पारदर्शकता आणण्याबाबत शासन काय कार्यवाही करणार आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (०८-०८-२०१७) :** (१) अशा आशयाची बातमी वृत्तपत्रात प्रसिध्द झाली होती.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) प्रत्येक वाहनमालक अर्जदाराने स्वत:च्या बँक खात्यातून डी.डी. काढल्याचे प्रतिज्ञापत्र घेण्यात येते व पसंतीक्रम न मिळाल्यास अर्जदाराची खात्री करून लिलावाच्या ठिकाणीच डी.डी. परत करण्यात येतात.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नंदुरबार जिल्ह्यातील अवैध धंद्यांना प्रतिबंध घालणेबाबत

**(१४) २४६७६ (०४-०१-२०१७). श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नंदुरबार जिल्ह्यात अवैध धंदे मोठ्या प्रमाणात सुरू असूनही याकडे पोलीस जाणून बूजून दुर्लक्ष करीत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नंदुरबार या बालशहीदांच्या भूमीत अशा प्रकारे गल्लोगल्ली अवैध धंदे सुरू असल्याने स्थानिक नागरिक, महिला, विद्यार्थी व वयोवृध्दांना त्रास सहन करावा लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर जिल्हयात पोलिसांच्या संगनमताने वाढणाऱ्या अवैध धंद्यांना आळा घालण्यासाठी शासनस्तरावरुन कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०८-२०१७) :** (१) हे खरे नाही.

प्राप्त तक्रारी व गोपनिय माहितीच्या आधारे स्थानिक पोलीस स्टेशन, वरीष्ठ अधिकारी व स्थानिक गुन्हे शाखा यांचे मार्फतीने वेळोवेळी कार्यवाही करण्यात येते.
(२) हे खरे नाही.

नंदुरबार जिल्हयातील अवैध धंद्यांना आळा बसावा या करीता जिल्हा स्तरावर कार्यरत असलेले स्थानिक गुन्हे अन्वेषण शाखेचे स्वतंत्र भरारी पथक कार्यरत असून अपर पोलीस अधिक्षक, सर्व उप विभागीय पोलीस अधिकारी यांचे मार्फत देखील अशा प्रकारची कार्यवाही सातत्याने करण्यात येते तसेच वेळोवेळी अवैध धंदे विरुध्द विशेष मोहिम राबवुन प्रभावीपणे कारवाई करण्यात येते. सन २०१६ मध्ये खालीलप्रमाणे प्रतिबंधक कारवाई करण्यात आली आहे.

**सन २०१६**

| **प्रकार** | **केसेस** | **आरोपी** | **जप्त माल** |
|---|---|---|---|
| दारु गाळण | १६ | १६ | २,८३,४२२ |
| ताब्यात बाळगणे | ५७० | ५७३ | ६१,५८,५८३ |
| वाहतुक करणे | ०५ | ०९ | ६२,८०,९५४ |
| इतर | ०६ | ०६ | २५० |
| एकुण कारवाई | ५९७ | ६०४ | १,२७,२३,२०९ |
| जुगार केसेस | २७७ | ३१३ | ४,१७,४३९ |

(३) अवैधरित्या, बेकायदेशीरपणे चालविण्यात येणाऱ्या जुगार व मटक्याच्या अडडयांवर तसेच चालविणाऱ्या व्यक्तींविरुध्द कडक कारवाई करण्यात येते.

पोलिसांची नजर चुकवून लपतछपत अवैध धंदे करतात या करीता मा.विशेष पोलीस महानिरीक्षक नाशिक परिक्षेत्र, पोलीस अधिक्षक, अपर पोलीस अधिक्षक, उपविभागीय पोलीस, अधिकारी, स्थानिक गुन्हे शाखा यांचे द्वारे जिल्हयातील अवैध धंदेची माहिती घेवून स्वतंत्र पथक पाठवून विविध ठिकाणी छापे टाकुन कार्यवाही करण्यात येते.

हातभट्टी दारुस आळा बसावा या करीता जिल्हयात अधिक्षक, दारुबंदी व उत्पादन शुल्क विभागाचे पथक देखील कार्यरत असून जिल्हयाचे जिल्हाधिकारी/पोलीस अधिक्षक यांचेशी समन्वय साधून हातभट्टीला आळा बसविणेसाठी प्रभावीपणे कार्यवाही करण्यात येते.

(४) विलंब झालेला नाही.

---

## वसई-विरार महानगरपालिकेत कायमस्वरुपी अभियंते सेवेत घेण्याबाबत

**(१५) २५३३० (०४-०१-२०१७). श्री.आनंद ठाकूर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई-विरार महानगरपालिकेमध्ये कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांपैकी फक्त २ अभियंता कायमस्वरुपी सेवेत असून बाकी सर्व अभियंते कंत्राटी पध्दतीवर मागील अनेक वर्षांपासून काम करीत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुमारे तीन वर्षांपासून कायमस्वरुपी अभियंते सेवेत घेण्याकरिता शासनाने आकृतीबंध मंजूर करुनही अद्याप भरती केली जात नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, तद्नुसार महानगरपालिकेच्या कामाचा दर्जा वाढविणे व टिकविण्यासाठी कायमस्वरुपी भरती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (३१-०८-२०१७) :** (१) कायम ४ व प्रतिनियुक्तीवर ५ असे एकूण ९ अभियंता कार्यरत आहेत. तर ८८ कनिष्ठ अभियंता कंत्राटी तत्वावर कार्यरत आहेत.

(२) शासनाने दिनांक ०९/०९/२०१४ रोजी महानगरपालिकेसाठी सुधारित आकृतिबंध मंजुर केला आहे. त्यामध्ये अभियांत्रिकी संवर्गातील विविध पदे मंजुर करण्यात आली.

तसेच विभागीय आयुक्त कार्यालय (मागासवर्गीय कक्ष) यांच्याकडे सुधारित आकृतीबंधानुसार रोस्टर तपासणी चालू आहे. तद्नंतर विहित पध्दतीने भरती प्रक्रिया वसई विरार महानगरपालिका राबवणार आहे.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सिंधुदुर्ग जिल्ह्यातील महिलांना प्रशिक्षण देऊन आर्थिक बाबतीत सक्षम करण्याबाबत

**(१६) २६०९० (०४-०१-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिंधुदुर्ग जिल्ह्यात ३०० गावात क्वायर उद्योगातून पहिल्या टप्प्यात १ हजार महिलांना प्रशिक्षण देऊन आर्थिक सक्षम करण्यात येईल असे लघुउद्योग विकास महामंडळाच्या सह संचालिका यांनी माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान जाहिर केल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी रुपये ५ कोटी निधी मंजूर असून १५ ऑगस्ट पासून मोबाईल व्हॅनव्दारे क्वायर उद्योगाची चळवळ जिल्हाभर पोहोचवली जाईल आणि तामिळनाडूच्या धर्तीवर कोकणात नारळाची सोडणे जाळण्यावर बंदी आणण्याचा विचार असल्याचे देखील त्यांनी जाहिर केले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या प्रकल्पांतर्गत माहे ऑक्टोबरपर्यंत किती महिलांना क्वायर उद्योगाचे प्रशिक्षण देण्यात आले व त्यासाठी किती निधी खर्च झाला,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (२९-०७-२०१७) :** (१) व (२) हे खरे आहे.
(३) दिनांक २३/१२/२०१६ रोजी महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळाने प्रशिक्षण कार्यक्रमाची सुरुवात केली असून त्याअंतर्गत आजपर्यंत १२ प्रशिक्षण केंद्रावर ३६० महिलांना दोरी तयार करण्याचे प्रशिक्षण देण्यात आले आहे. या प्रशिक्षणासाठी एकूण रू. १५.०० लक्ष एवढा निधी खर्च करण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील इंदिरा गांधी शासकिय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेयो) येथील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१७) २६८१६ (१५-०४-२०१७). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) इंदिरा गांधी शासकीय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेयो) नागपूर येथील रिक्त पदे २ आठवडयात भरण्याबाबतचे निर्देश नागपूर खंडपिठाने दिनांक १४ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनास दिल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर रिक्त पदे भरण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२०-०७-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर या संस्थेच्या शस्त्रक्रिया गृहासाठी नव्याने निर्माण झालेल्या २५० खाटांच्या रुग्णालयाकरीता १८३ पदे भरण्याबाबत संचालनालयाकडून प्रस्ताव प्राप्त झाला असून, पदे भरण्याबाबत शासन स्तरावर कार्यवाही सुरू आहे.

---

## म्हाडाच्या संक्रमण शिबिरातील घुसखोरांना नियमित करण्यासंदर्भात उपसमितीची स्थापना केल्याबाबत

**(१८) २६९८८ (१३-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) म्हाडाच्या संक्रमण शिबिरातील घुसखोरांना नियमित करण्याबाबत उपसमितीची स्थापना माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, संक्रमण शिबिरातील एकूण घुसखोरांची संख्या किती आहे तसेच यातील बऱ्याच घुसखोरांना म्हाडाच्या अधिकाऱ्यांनीच त्यांच्याकडून पैशाचा व्यवहार करुन सदनिकेचा ताबा दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी स्थापन करण्यात आलेल्या समितीने कोणत्या शिफारशी केल्या आहेत तसेच याबाबत शासनाचा अंतिम निर्णय काय आहे,

(४) असल्यास, अनधिकृत सदनिकेचा ताबा घेणाऱ्या आणि गैरमार्गाने सदनिकेचा ताबा देणाऱ्या अधिकाऱ्यांविरूध्द शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. प्रकाश महेता (०४-०८-२०१७) :** (१) झोपडपट्टी पुनवर्सन योजनेंतर्गत पुनर्वसन सदनिकांची खरेदी-विक्री संबंधी मा.न्यायालयाच्या आदेशाच्या अनुषंगाने यापुर्वी मा.मंत्री, गृहनिर्माण यांनी विधानसभेमध्ये दिलेल्या आश्वासनानुसार शासन स्तरावरुन करावयाची कार्यवाही आणि संक्रमण शिबीरातील मूळ भाडेकरुना पुनर्विकासामध्ये आहे त्याच ठिकाणी पुनर्वसन सदनिका देणे तसेच संक्रमण शिबीरातील अनधिकृत रहिवाश्यांना पंतप्रधान आवास योजनेच्या सर्वांसाठी घरे अभियानांतर्गत केंद्र व राज्य शासनाच्या निर्णयानुसार योग्य त्या सदनिका देण्यासाठी धोरण ठरविण्यासंदर्भात मा.मंत्री, गृहनिर्माण यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली आहे.

(२) माहे जुलै, २०१३ अखेर मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळाच्या अखत्यारीतील संक्रमण शिबीरात ८४४८ घुसखोर/अनधिकृत रहिवाशी वास्तव्यास असल्याचे निदर्शनास आले आहे.

घुसखोरांना म्हाडाच्या संक्रमण गाळयांचा अनधिकृतपणे ताबा देण्याच्या प्रक्रियेमध्ये म्हाडा अधिकारी/कर्मचारी यांचा सहभाग असल्याचे प्रथमदर्शनी निदर्शनास आल्याने संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचे विरुध्द धारावी पोलीस ठाणे येथे दिनांक २०/१०/२०१० रोजी गुन्हा क्रमांक ५१६/२०१० दाखल करण्यात आला आहे. सद्य:स्थितीत प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

(३) सदर प्रकरणी उपसमितीने अद्यापपर्यंत कोणत्याही शिफारशी केल्या नाहीत. त्यामुळे शासनाचा निर्णय प्रलंबित आहे.

(४) ज्या प्रकरणांत अनधिकृतपणे संक्रमण गाळयांचा ताबा घेण्यात आलेला आहे, अशा प्रकरणांमध्ये मुळ भाडेकरु/रहिवाशी, दलाल व दोषी अधिकारी यांचेविरुध्द संबंधित पोलीस ठाण्यामध्ये गुन्हा नोंदविण्यात आला आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**ई-निविदा प्रक्रियेत मुद्रांक शुल्काचा गैरवापर होत असल्याबाबत**

**(१९) २७०१७ (१३-०४-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.मितेश भांगडिया, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई सार्वजनिक बांधकाम विभागातील ई-निविदेसाठी कंत्राटदारांना मुद्रांक (स्टॅम्प पेपर) लिखीत शपथपत्र द्यावे लागत असतांना वेगवेगळया कामासाठी एकच (तेच-तेच) स्टॅम्प पेपर वापरले जात असल्याने शासनाच्या महसूलाचे नुकसान होत असल्याचे सकाळ इन्व्हेस्टिगेशन टीमने दिनांक २५ नोव्हेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास केलेल्या सर्व्हेवरून निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर ई-निविदा प्रक्रियेत मुद्रांक शुल्काचा गैरवापर होत असल्याने उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१९-०८-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) तथापि, मुख्य अभियंता (विद्युत) सा.बां.वि. मुंबई यांच्या कार्यालयांतर्गत काही निविदांबाबत अशा आशयाच्या तक्रारी प्राप्त झाल्या असून सदर तकारींबाबत व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांचे मार्फत चौकशी प्रगतीत आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये जागतिक स्तरावरील ज्ञान उपलब्ध व्हावे यासाठी तयार करण्यात येत असलेल्या कृती आराखडयाबाबत**

**(२०) २७१९७ (१७-०४-२०१७). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जगभरातील प्रगत देशांमधील वैद्यकीय ज्ञानाच्या तोडीस तोड असे ज्ञान राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयामध्ये उपलब्ध व्हावे, यासाठी वैद्यकीय शिक्षण विभागाने एक योजना हाती घेतलेली असून या योजनेंतर्गत सन २०३० पर्यंतचा कृती आराखडा तयार करण्याचे काम शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाच्या अधिष्ठात्यांवर सोपविण्यात आलेले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या योजनेचे स्वरुप काय आहे व कृती आराखडा तयार करण्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,
(३) असल्यास, उक्त योजना केव्हापासून कार्यान्वित करण्यात येणार आहे, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे व सदर निधी कशाप्रकारे उपलब्ध करण्यात येणार आहे ?

**श्री. गिरीष महाजन (०३-०८-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) शैक्षणिक उपक्रम तसेच रुग्णसेवा व संशोधनाचा दर्जा वाढविण्यासाठी अस्तित्वात असलेल्या सोईसुविधा, मनुष्यबळ, यंत्रसामुग्री व बांधकाम यांचा एकंदरीत आढावा घेऊन नव्याने सुरु करावयाच्या अभ्यासक्रमांसाठी तसेच केंद्र शासनाने वाढ केलेल्या पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या प्रवेशक्षमतेनुसार भारतीय

आयुर्विज्ञान परिषदेच्या मानकांची पूर्तता करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांबाबत कृती आराखडा सन २०३० तयार करण्याची कार्यवाही वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांच्या स्तरावरुन सुरु आहे.

(३) वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या संस्थांकडून कृती आराखड्याबाबत वस्तुस्थितीदर्शक अहवाल प्राप्त करण्याची कार्यवाही सुरु आहे. त्यानंतर निधी उपलब्धतेबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

---

**शासकीय, खाजगी व अभिमत विद्यापीठांची प्रवेश प्रक्रिया (कॅम्प) एकाच छत्राखाली आणण्याबाबत**

**(२१) २७१९९ (१५-०४-२०१७). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील वैद्यकीय व दंत वैद्यकीय प्रवेशांसाठी प्रत्येक अभिमत विद्यापीठांनी स्वत:ची स्वतंत्र केंद्रीय प्रवेश प्रक्रिया (कौन्सिलिंग सेशन) राबविल्यास विद्यार्थ्यांचे सुमारे चाळीस हजार रुपयांचे नुकसान होईल, त्याऐवजी केवळ एक हजार रुपये शुल्कामध्ये शासकीय, खाजगी व अभिमत विद्यापीठांची प्रवेश प्रक्रीया (कॅप) एकाच छत्राखाली आणण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रस्ताव केव्हापासून कार्यान्वित करण्यात येणार आहे व यासंदर्भातील सद्य:स्थिती काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२०-०७-२०१७) :** (१) सन २०१६-१७ या वर्षासाठी राज्यातील खाजगी विनाअनुदानित आरोग्य विज्ञान अभ्यासक्रमांचे प्रवेश एकत्रित समुपदेशाद्वारे करण्यात आले आहेत. तसेच अभिमत विद्यापीठातील वैद्यकीय व दंत महाविद्यालयाचे प्रवेश केंद्र शासनाच्या निर्देशानुसार एकत्रित कौन्सिलींगमार्फत करण्यात आलेले आहेत.

(२) सन २०१६-१७ पासून प्रक्रिया कार्यान्वित झालेली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील खाजगी व अनुदानित शासकिय आयुर्वेद शाखेच्या प्रथम वर्ष प्रवेशास विलंब झाल्याने परिक्षा पुढे ढकलण्यात आल्याबाबत

**(२२) २७२५५ (१७-०४-२०१७). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील खाजगी व अनुदानित शासकिय आयुर्वेद शाखेच्या सन २०१६-१७ या वर्षातील प्रथम वर्ष प्रवेशास विलंब झाल्याने विद्यापीठाने अंतिम परिक्षा उन्हाळी सत्र सहा महिने पुढे ढकलून माहे नोंव्हेबर-डिसेंबर, २०१७ मध्ये घेण्यात येणार असल्याचे दिनांक २५ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर परिक्षेचा कालावधी वाढल्याने पदव्युत्तर परिक्षेत विद्यार्थ्यांचे नुकसान होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२८-०७-२०१७) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.

(२) नाही, हे खरे नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वीज वितरण व्यवस्थेच्या पायाभूत विकासाबाबत

**(२३) २७३२० (१२-०४-२०१७). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वीज वितरण व्यवस्थेच्या पायाभूत विकासासाठी रुपये ४ हजार कोटी खर्चाची योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त योजनेचे स्वरुप काय आहे, तद्नुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (०४-०८-२०१७)** : (१) व (२) दीनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजनेमध्ये राज्यातील ग्रामीण भागातील ३,९४,१४१ दारिद्रयरेषेखालील लाभार्थी सहित १२,४८,४७४ घरगुती ग्राहकांना नवीन वीज जोडणी देणे, ८३७ वाहिन्याचे वाहिनी विलनीकरण करणे, वीज वितरण प्रणाली सक्षमीकरण करणे, सांसद आदर्श ग्रामयोजनेच्या ६९ गावांमध्ये वीज वितरण प्रणालीचे सक्षमीकरण करणे व महाराष्ट्र राज्यातील ३३ जिल्ह्यांमध्ये २१५ नवीन उपकेंद्रे, १०० उपकेंद्राची रोहित्र क्षमतावाढ, १०९२४ वितरण रोहित्रे, १९४१७ किमी उच्चदाब वाहिनी, ६२१८.४ किमी लघुदाब वाहिनी उभारणे इत्यादी कामांचा समावेश आहे.

एकात्मिक ऊर्जा विकास योजनेमध्ये राज्यातील शहरी भागात ३,४९८ किलोव्हॅट क्षमतेचे सौर प्रकल्प उभारणे, ६,२१,४७३ नवीन मीटर बसविणे तसेच महाराष्ट्र राज्यातील २५४ शहरामध्ये वीज वितरण प्रणाली सक्षमीकरण करण्यासाठी १२८ नवीन उपकेंद्रे, ८९ उपकेंद्रांची रोहित्र क्षमतावाढ, ५७०५ वितरण रोहित्रे, ४५३२.०२ किमी उच्चदाब वाहिनी, ३२३९.९५ किमी लघुदाब वाहिनी उभारणे इत्यादी कामाचा समावेश आहे.

सदर दोन्ही योजनेच्या कामांच्या निविदा महावितरण कंपनीतर्फे काढण्यात आल्या असून कंत्राटदारांना एप्रिल, २०१७ मध्ये कार्यादेश देण्यात आले आहेत. सदर कामे दोन वर्षात पूर्ण करावयाची आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विनाअनुदानित महाविद्यालयांच्या अनुदानाबाबत

**(२४) २७४३६ (१२-०४-२०१७). श्री.प्रकाश गजभिये : दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ४ मधील प्रश्न क्रमांक २१४९१ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २००१ पूर्वीची विनाअनुदानित महाविद्यालये किती आहेत,

(२) असल्यास, राज्यातील विनाअनुदानित महाविद्यालयातर्फे वेळावेळी आंदोलने करण्यात येवूनही या सर्व विनाअनुदानित महाविद्यालयांना अजूनही अनुदान देण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त महाविद्यालयांना अनुदान देण्याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१६-०८-२०१७) :** (१) राज्यात सन २००१ पूर्वीची एकूण २८ विनाअनुदानित महाविद्यालये आहेत.
(२) व (३) शासनाच्या धोरणानुसार विनाअनुदानित (टप्पा अनुदान) महाविद्यालयांसंदर्भात कार्यवाही करण्यात येते.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यात विशेषत: नाशिक व मालेगांव सारख्या महत्वाच्या तसेच संवेदनशील शहरात सी.सी.टी.व्ही. यंत्रणा उभारण्याबाबत**

**(२५) २८००१ (१७-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक १९७८६ ला दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सुरक्षिततेसाठी सार्वजनिक ठिकाणी सी.सी.टी.व्ही. यंत्रणा बसविण्याबाबत मार्गदर्शक तत्वे विहित करण्याच्या विचाराधीन असलेल्या बाबींवर शासनाचा विचार पुर्ण झाला आहे काय,
(२) असल्यास, नाशिक शहरात सिंहस्थ कुंभमेळयाच्या सुरक्षेसाठी तात्पुरत्या स्वरुपात बसविण्यात आलेले सी.सी.टी.व्ही. कॅमेरे काढून टाकण्यात आल्याने नाशिक शहरात कायमस्वरुपी सी.सी.टी.व्ही. बसविण्याच्या विचाराधीन बाबीवर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) असल्यास, मालेगांव (जि.नाशिक) सारख्या संवेदनशील शहरात गतकाळात घडलेल्या गंभीर घटना पाहता सार्वजनिक ठिकाणी सी.सी.टी.व्ही. यंत्रणा बसविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२२-०८-२०१७) :** (१) गृह विभाग, शासन निर्णय दिनांक ०९/०१/२०१७ अन्वये राज्यातील विविध शहरात सी.सी.टी.व्ही. यंत्रणा कार्यान्वित करण्यासंदर्भात मार्गदर्शक तत्वे विहीत करण्यात आली आहेत.
(२) नाशिक शहरात कायमस्वरुपी सी.सी.टी.व्ही. बसविण्याबाबत माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या नाशिक शहर स्मार्ट सीटी प्रकल्पांतर्गत नाशिक शहर सी.सी.टी.व्ही. प्रकल्प राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.
(३) व (४) मालेगांव शहरातील पोलीस स्टेशनच्या हद्दीत काही ठिकाणी खाजगीरित्या स्थानिक नागरिकांच्या मदतीने सी.सी.टी.व्ही. बसविण्यात आले आहेत. तसेच मालेगांव महानगरपालिकेमार्फत सार्वजनिक सुरक्षिततेच्यादृष्टीने शहरात कायमस्वरुपी सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी अंदाजे रु. २० कोटी एवढा निधी आवश्यक असुन त्याबाबत महासभेत ठराव क्र.२१, दिनांक ०९.०९.२०१६ पारित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने शासनास प्रस्ताव प्राप्त झाल्यावर विहीत मार्गदर्शक तत्वानुसार पुढील कार्यवाही करणे अपेक्षित आहे.

---

## नागपूर विद्यापीठातील महाविद्यालयांवर कारवाई करण्याबाबत

**(२६) २८०३६ (१२-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर विद्यापीठात गत ५ वर्षापासून अनेकदा विविध कारणांमुळे परिक्षा रद्द होणे किंवा पेपर पुढे ढकलण्याचे प्रकार होत असल्याने विद्यापीठाला एक कोटीहून अधिक रुपयांचे नुकसान झाल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विविध महाविद्यालयांच्या चुकांमुळे पेपर पुढे ढकलण्याची वेळ विद्यापीठावर आली असून कोणत्या महाविद्यालयांच्या चुकांमुळे परिक्षा रद्द व पुढे ढकलण्यात आली,
(३) तसेच उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दोषी महाविद्यालयांकडून निधी वसुली करण्याबाबत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२१-०८-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) एकूण २६ महाविद्यालयांमुळे परिक्षा रद्द व पुढे ढकलण्यात आलेली आहे.
(३) विद्यापीठाच्या अनुशासन कृती समितीमार्फत चौकशी करण्यात आली असून यातील सर्व दोषी महाविद्यालयांच्या केंद्रप्रमुखांना अनुज्ञेय असलेल्या पारिश्रमिकांच्या रकमेची कपात करुन नुकसान भरपाईची कार्यवाही करण्यात आलेली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्य व केंद्र शासनाच्या शेतीविषयक योजनांची माहिती राज्यातील शेतकऱ्यांपर्यंत पोहचविण्याबाबत

**(२७) २८२१७ (१३-०४-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.तानाजी सावंत :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य व केंद्र शासनाने राज्यातील शेतकऱ्यांसाठी आणलेल्या योजनांची माहिती शेतकऱ्यांपर्यंत पोहोचत नसल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सदर योजना शेतकऱ्यांपर्यंत पोहचवून शेतकऱ्यांची होणारी गैरसोय दूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (११-०९-२०१७) :** (१) नाही.
(२) राज्यातील कृषि योजनांची माहिती शेतकऱ्यांना देण्यासाठी राज्यस्तरावरुन, जिल्हास्तरावरुन, तालुकास्तरावरुन तसेच गावपातळीवर शेतकरी मेळावे, शेतकरी प्रशिक्षण, चर्चासत्रे, प्रदर्शने, शेतीशाळा इ. कार्यक्रमांच्या माध्यमातून दिली जाते. तसेच विविध कृषि योजनांची माहिती घडीपत्रिका, पोस्टर्स, पुस्तिका, प्रिंट मिडियाच्या माध्यमातून राज्यातील शेतकऱ्यांना दिली जाते. तसेच कृषि विभागाच्यावतीने राज्यातील शेतकऱ्यांना पिकांचे आधुनिक तंत्रज्ञान तसेच विविध योजनांची माहिती देण्यासाठी शेतकरी मासिक दरमहा प्रकाशित केले जाते तसेच आकाशवाणी, दुरदर्शन वरुन नियमितपणे कृषि विषयक योजनांची माहिती दिली जाते.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई उपनगर जिल्हाधिकारी कार्यालयासमोरील भूखंडाबाबत

**(२८) २८२६७ (१३-०४-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई उपनगर जिल्हाधिकारी कार्यालयासमोरील भूखंड कोणत्या संस्थेला देण्यात आला आहे व त्यासदंर्भात करारनामा झाला आहे काय,

(२) असल्यास, किती वर्षाकरिता भूखंड लिजवर देण्यात आला आहे,

(३) असल्यास, उक्त संस्थेने कोणत्या कारणाकरिता भूखंडाचा वापर केला आहे,

(४) नसल्यास, सदरहू भूखंडासंदर्भात झालेला करार रद्द करुन भूखंड परत घेण्यात येणार आहे काय,

(५) नसल्यास, त्याची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१८-०७-२०१७) :** (१) व (२) मुंबई उपनगर जिल्हाधिकारी कार्यालयासमोरील मोकळा भूखंड "मराठवाडा मित्र मंडळ" या संस्थेस शासन ज्ञापन, दिनांक १५/१२/१९८१ अन्वये नाममात्र रुपये १/- वार्षिक भाडेपट्टयाने ९९ वर्षाच्या मुदतीवर मंजूर करण्यात आला होता. तद्नंतर शासन ज्ञापन दिनांक २४/०२/२००९ व दिनांक १९/०५/२००९ अन्वये सदर भूखंड या संस्थेस कब्जेहक्काने मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या कार्यालयाने दिनांक १५/१०/२०१० रोजी आदेश निर्गमित केले असून संबंधित संस्थेकडून कब्जेहक्काची किंमत रुपये ११,८२,५०,०००/- चा भरणा करुन घेण्यात आलेला आहे. तसेच या जमिनीच्या कब्जेहक्काचा करारनामा दिनांक २५/०४/२०११ रोजी निष्पादित करण्यात आलेला आहे.

(३) उक्त संस्थेस सदरहू जमीन "वसतिगृह /कम्युनिटी सेंटर व अभियांत्रिकी महाविद्यालय/व्यवस्थापन महाविद्यालय" या प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आली आहे. तथापि सदरहू संस्थेने आजपावेतो या जमिनीचा वापर केलेला नाही.

(४) व (५) “मराठवाडा मित्र मंडळ” या संस्थेने सदर जमीन मंजूरी आदेशातील अटी/शर्तीचा भंग केल्याच्या कारणास्तव या संस्थेस जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या कार्यालयाने दिनांक १४/०९/२०१६ रोजी शर्तभंगाबाबत नोटीस दिली आहे. त्यानुसार या प्रकरणी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचेकडे सुनावणीची कार्यवाही चालू आहे.

---

**मारेगांव (जि.यवतमाळ) तालुक्यातील बेंबळा धरणाचे पाणी शेतीला देण्याबाबत**

**(२९) २८४६० (१५-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मारेगांव तालुक्यातील (जि.यवतमाळ) शेतकऱ्यांनी शेतीसाठी बेंबळा धरणाचे पाणी देण्याची मागणी नायब तहसिलदार, मारेगांव यांचेकडे दिनांक २५ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त मागणीच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०३-०८-२०१७) :** (१) जलसंपदा विभागाकडे असे निवेदन प्राप्त झालेले नाही.

तथापि, मारेगांव तालुक्यातील शेतक-यांच्या शेतीसाठी बेंबळा धरणाचे पाणी देणे निश्चित आहे.

मुख्य कालव्याचे काम कि.मी. ११३ पर्यंत पुर्ण करण्यात आलेले असून सन २०१७-१८ चे खरीप व रब्बी हंगामात कालव्याच्या पुच्छ भागापर्यंत सिंचनाकरिता पाणी देण्याचे नियोजित आहे. मारेगांव तालुक्यातील जवळपास १००० हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळेल.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**यवतमाळ जिल्हयातील नेर शहराला बाहय वळण रस्ता करण्याबाबत**

**(३०) २८४६९ (१३-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले, श्री.रामराव वडकुते, श्री.आनंद ठाकूर, श्री.सतिश चव्हाण, श्री.प्रकाश गजभिये, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नेर (जि.यवतमाळ) शहराला बाहय वळण रस्ता करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विचाराधीन बाबींवरील शासनाचा अंतिम निर्णय झाला आहे काय,

(३) असल्यास, त्यानुसार सदर शहराला बाह्य वळण रस्ता करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१५-०६-२०१७) :** (१) व (२) होय.

(३) व (४) वळण रस्त्याच्या ३.९१५ कि.मी. लांबीपैकी २ कि.मी. लांबीमधील रस्त्यासाठी भुसंपादन करणे व बांधकाम करण्याचे काम मंजूर आहे. भुसंपादनाची कारवाई प्रगतीत आहे.

उर्वरित १.९१५ लांबीमधील वळण रस्त्याचे काम मंजूरी निधी निकष व प्राधान्यक्रमानुसार हाती घेण्याचे नियोजन आहे.

---

**राज्यातील सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांच्या समस्यांबाबत**

**(३१) २८८७९ (१३-०४-२०१७). श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात ७२००० नोंदणीकृत सुशिक्षित बेरोजगार अभियंते असून १०,००० सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांना मागील १० वर्षात एकही काम न

मिळाल्याने त्यांना ठेकेदारीचे नोंदणीचे नुतनीकरण करण्यास अडचणी येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांना (वर्ग-५) रु.५० लक्ष ऐवजी (वर्ग-४) रु. १ कोटी ५० लक्ष मध्ये नोंदणी देण्याची कार्यवाही करणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच, एकापेक्षा जास्त अभियंते एकत्र येवुन संयुक्त भागीदारी करुन त्यांना किमान रु. ५ कोटी किंमतीच्या स्पर्धात्मक निविदेसाठी मान्यता देणार आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सुशिक्षित बेरोजगारांना न्याय देण्याच्या दृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१९-०८-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकीय योजनांवर खर्च करतांना त्यांची गुणवत्ता आणि परिणामकता पाहण्यासाठी शासकीय कार्यालयांचेही केआरए (की रिझल्ट एरिया) तयार करण्याबाबत

**(३२) २९००५ (१७-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय योजनांवर खर्च करताना त्यांची गुणवत्ता आणि परिणामकता पाहण्यासाठी शासकीय कार्यालयांचे केआरए (की रिझल्ट एरिया) तयार करण्याच्या सूचना प्रत्येक विभागाला देण्यात आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासकीय योजना राबविताना या योजना प्रभावीपणे अंमलात आल्या आहे का, त्या लोकांपर्यंत पोहोचतात का, निधीचे नियोजन योग्यप्रकारे झाले किंवा गैरव्यवहार झाला, याची पाहणी केआरएद्वारे करण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, केआरए मूल्यांकनासाठी खासगी संस्थांची निवड करण्यात येणार आहे तसेच केआरए मूल्यांकनासाठी कोणत्या निकषावर व पात्रतेवर कोण-कोणत्या खासगी संस्थाची निवड करण्यात आली आहे,
(४) असल्यास, शासनाची उच्चस्तरीय समिती मूल्यांकन करु शकत नाही, हे ही खरे आहे काय ?

**श्री. सुधीर मुनगंटीवार (१९-०८-२०१७) :** (१), (२), (३) व (४) हे खरे नाही तथापि, वित्त विभागाच्या दिनांक १७ नोव्हेंबर, २०१६ च्या शासन निर्णयानुसार खर्चाची उत्पादकता जाणून घेण्यासाठी कामगिरीचे मोजमापन करण्यासाठीची कार्यपध्दती ठरविण्यात आली आहे.

उक्त शासन निर्णयान्वये विभागाला जो निधी उपलब्ध करुन दिला आहे, त्या निधीचा विनियोग कोणत्याप्रकारे झाला, त्याबाबतची खात्री करणे व विभागाने ठरविलेल्या निर्देशांकाप्रमाणे त्यांच्या कामाची मोजणी करणे अभिप्रेत आहे.

प्रशासकीय विभागांनी निवडलेल्या निर्देशांकानुसार झालेल्या कामांची मोजणी त्रयस्थ संस्थेमार्फत करणे अपेक्षित आहे. वित्त विभागाने कुठल्याही त्रयस्थ संस्थेची निवड केलेली नाही.

---

**बेकायदा सावकारी कर्ज फेडीचा प्रस्ताव रद्द करण्याबाबत**

**(३३) २९०९१ (१३-०४-२०१७). श्री.परिणय फुके, डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाच्या सहकार विभागाने बेकायदा सावकारी कर्ज फेडण्यासंदर्भातील प्रस्ताव माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान तयार केला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील ज्या शेतक-यांना सावकारांनी त्यांच्या परवाना क्षेत्राबाहेर कर्ज पुरवठा केल्याचे आढळून आले ती कर्ज फेडण्यास विधी व न्याय विभाग आणि वित्त विभाग यांनी तीव्र आक्षेप घेतला आहे तसेच सहकार विभागाने बेकायदा कर्जफेडीचा प्रस्ताव रद्द केला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देशमुख (०८-०८-२०१७) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.
(३) ज्या सावकारांनी त्यांच्या परवाना कार्यक्षेत्राबाहेरील शेतकऱ्यांना कर्ज वाटप केले आहे त्याबाबत मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे जनहित याचिका क्र.४३/२०१६ द्वारे सदर प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे. सद्य:स्थितीत शासनाने अंतिम असा निर्णय घेण्यासाठी प्रकरण प्रलंबित आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## धुळे, नंदुरबार, जळगाव जिल्हयातील सहकाराच्या माध्यमातून केलेल्या २२ उपसा सिंचन योजना दुरुस्तीबाबत

**(३४) २९४९५ (१५-०४-२०१७). श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) धुळे, नंदुरबार, जळगाव जिल्हयातील सहकाराच्या माध्यमातून केलेल्या २२ उपसा सिंचन योजना दुरुस्त करण्याची घोषणा होऊनही दुरुस्तीला सुरुवात झाली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दुरुस्तीच्या कामाला सुरुवात होण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०३-०८-२०१७) :** (१) होय. धुळे व नंदुरबार जिल्ह्यातील २२ सहकारी उपसा सिंचन योजनांना विशेष दुरुस्ती करुन पुनकार्यान्वित करण्यासाठी शासनाने दिनांक ०६/०६/२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.मात्र अद्याप प्रत्यक्ष कामांना सुरुवात होऊ शकलेली नाही ही वस्तुस्थिती आहे.

(२) २२ उपसा सिंचन योजनांच्या स्थापत्य, यांत्रिकी व विद्युत घटक भागांच्या दुरुस्तीच्या एकत्रित ४ निविदांना कंत्राटदारांनी प्रतिसाद दिला नसल्याने प्रत्यक्ष कामास सुरुवात करता आली नाही. सद्य:स्थितीत तिनही घटक भागांच्या स्वतंत्र निविदा प्रसिद्धीस दिल्या असून स्थापत्य कामाच्या ७ पैकी ३ निविदांची कार्यवाही अंतिम टप्प्यात आहे. उर्वरीत ४ निविदांची कार्यवाही प्रगतीत आहे. वरीलप्रमाणे कार्यवाही सुरु असल्याने चौकशीचा प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील नद्यांचे प्रदुषण रोखून नद्या स्वच्छ करण्याबाबत

**(३५) २९५९६ (१२-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाने सन २०१४-१५ मध्ये प्रसिध्द केलेल्या अहवालात राज्यातील सर्वाधिक ४९ नद्यांचा समावेश अत्यंत प्रदूषित नद्यांमध्ये आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील कोणत्या नद्यांचा यात समावेश आहे,

(३) असल्यास, या नद्यांचे प्रदूषण रोखून नद्या स्वच्छ करण्याकरिता शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. रामदास कदम (०३-०८-२०१७) :** (१) होय.

(२) सन २००९ ते २०१२ या कालावधीतील नदी पाण्याच्या गुणवत्तेच्या निकालांनूसार मार्च, २०१५ रोजी कैंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळाने नद्यांच्या प्रदूषित पट्ट्यांबाबत प्राथम्यता १, २, ३, ४ व ५ यात विभागणी केलेली आहे. यात प्राधान्य क्र. १ मध्ये ४ नद्या (गोदावरी, मिठी, मोरना, वर्धा), प्राधान्य क्र. २ मध्ये ५ नद्या (कन्हन, कृष्णा, कुंडलिका, पूर्णा, वैनगंगा), प्राधान्य क्र. ३ मध्ये १८ नद्या (भीमा, चंद्रभागा, घोड, इंद्रायणी, मुळा, मुळा-मुठा, मुठा, निरा, पवना, पेढी, पेनगंगा, रंगवली, सावित्री, सिना, तापी, वेल, वेना, अमरावती), प्राधान्य क्र. ४ मध्ये १२ नद्या (भातसा, बिंदुसारा, दारना, गिरना, गोमाई, कान, कोयना, मांजरा, पंचगंगा, सुर्या, उरमोडी, वेन्ना) आणि प्राधान्य क्र. ५ मध्ये १० नद्या (अंबा, हिवारा, मोर, पांजरा, पाताळगंगा, पेल्हार, उल्हास, वैतरना, वशिष्ठी, वाघुर) या नद्यांवरील प्रदूषित पट्टयांचा समावेश आहे.

(३) राज्यातील नद्यांच्या सर्वेक्षणावरुन ४९ प्रदूषित पट्टे आढळून आले आहेत व त्यावरील प्रदूषण कमी करण्यासाठी पुढील प्रमाणे उपाय योजना करण्यात येत आहेत.

अ) राष्ट्रीय नदी कृती योजना व राज्य नदी कृती योजना राबविण्यात येत आहे.

ब) प्रदूषण नियंत्रण मंडळाने उदयोगांना विनाप्रक्रिया सांडपाण्याचा विसर्ग करण्यास बंदी घातलेली असून उदयोगातून निर्मित होणाऱ्या सांडपाण्यावर प्रक्रिया करून प्रक्रियाकृत सांडपाणी बाहेर सोडण्याचे निर्देश दिलेले आहेत.

क) राज्यातील महानगरपालिका व नगरपालिका यांना सांडपाणी व नागरी घनकचरा व्यवस्थापनाबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत.

ड) सद्य:स्थितीत ४९ पट्टयांपैकी १३ पट्टे प्रदूषित पट्टे म्हणून गणले जात नाही.

इ) राज्यात दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयान्वये नमामि चंद्रभागा प्राधिकरणाची स्थापना करण्यात आलेली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## चाळीसगांव (जि.जळगांव) येथील बेलगंगा कारखाना सुरु करण्याबाबत

**(३६) २९६२८ (१२-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चाळीसगांव (जि.जळगांव) येथील बेलगंगा कारखाना लोक सहभागातून सुरु करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या कारखान्याची लिलाव प्रक्रिया पूर्ण झाली आहे काय, त्याची सद्यःस्थिती काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देशमुख (३१-०७-२०१७) :** (१) नाही.

(२) जळगाव जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेने सरफेसी कायद्यांतर्गत ताब्यात घेवून बेलगंगा सहकारी साखर कारखान्याची विक्री प्रक्रिया ऑनलाईन राबविली आहे. सदर लिलाव प्रक्रियेविरूद्ध कारखान्याच्या कामगार युनियनने मा.उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र. ३३३/२०१७ दाखल केली आहे. मा.न्यायालयाने सदर याचिकेवर निर्णय होईपर्यंत लिलाव प्रक्रिया अंतिम करण्यात येऊ नये, असे अंतरिम आदेश दिले आहेत. सद्यःस्थितीत सदर बाब न्यायप्रविष्ट आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही

---

## पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रमांतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानाबाबत

**(३७) २९६४२ (१५-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रमांतर्गत उद्योगासाठी महिला, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, अल्पसंख्याक, माजी सैनिक व अपंगांना ग्रामीण भागासाठी ३५ तर शहरी भागासाठी २५ टक्के अनुदान देण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या करिता जळगांव जिल्हयातून किती अर्ज आले आहेत,

(३) असल्यास, किती जणांना या योजनेचा लाभ मिळाला आहे,
(४) असल्यास, याबाबतची सद्यःस्थिती काय आहे ?

**श्री. सुभाष देसाई (११-०८-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रमांतर्गत रु. २५ लक्ष किंमतीच्या उत्पादन प्रकल्पासाठी अनुसूचित जाती/जमाती, इतर मागासवर्गीय जाती/ अल्पसंख्याक/ माजी सैनिक/अपंग/महिला या विशेष प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी, ग्रामीण भागात ३५ टक्के व शहरी भागात २५ टक्के अनुदान बँकानी मंजूर केलेल्या एकूण प्रकल्प रकमेवर अनुज्ञेय आहे.

(२) सदर योजनेची अंमलबजावणी ऑक्टोबर २००८ पासून, ग्रामीण क्षेत्रासाठी खादी ग्रामोद्योग आयोग, महाराष्ट्र खादी ग्रामोद्योग मंडळ व शहरी भागासाठी उद्योग संचालनालयाच्या अधिपत्याखालील जिल्हा उद्योग केंद्रे यांच्याकडून करण्यात येत असून, खादी व ग्रामोद्योग आयोग, भारत सरकार, यांच्याकडून योजनेचे सनियंत्रण करण्यात येत आहे.

जळगाव जिल्हयाकरीता सन २०१६-१७ मध्ये १०१४ व सन २०१७-१८ (जुलै अखेर) मध्ये ४७० अर्ज प्राप्त झालेले आहेत. जळगाव जिल्हयाकरीता मागील दोन वर्षात दिलेली उद्दीष्टे, प्राप्त अर्ज व जिल्हा कार्यबल समितीने विविध बँकांकडे शिफारस केल्याबाबतची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | सन | अंमलबजावणी यंत्रणा | उद्दीष्ट | | प्राप्त अर्ज | कार्यबल समितीने बँकांकडे शिफारस केलेले अर्ज |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | संख्या | अनुदान | | |
| १ | २०१६-१७ | खादी व ग्रामोद्योग आयोग | २० | ३९.९८ | १२१ | ५५ |
| | | महाराष्ट्र खादी ग्रामोद्योग मंडळ | ५२ | १०४.२८ | ४२० | ३३१ |
| | | जि. उ. केंद्र | ६७ | १३४.०० | ४७३ | ३५३ |
| | | **एकुण** | **१३९** | **२७८.२६** | **१०१४** | **७३९** |
| २ | २०१७-१८ | खादी व | १४ | २७.७९ | २८ | १७ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | ग्रामोद्योग आयोग | | | | |
| | | महाराष्ट्र खादी ग्रामोद्योग मंडळ | ३५ | ६८.९४ | १४१ | ६ |
| | | जि. उ. केंद्र | ४१ | ८०.७७ | ३०१ | -- |
| | | **एकुण** | **९०** | **१७७.५** | **४७०** | **२३** |

(३) पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रमांतर्गत जळगाव जिल्ह्यामध्ये सन २०१६-१७ मध्ये ७७ व सन २०१७-१८ (जुलै अखेर) १२ लाभार्थ्यांना लाभ प्राप्त झालेले आहे.

| **अ.क्र.** | **सन** | **अंमलबजावणी यंत्रणा** | **मंजूर प्रकरणे** | | **वितरीत प्रकरणे** | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | **संख्या** | **अनुदान रु. लक्ष** | **संख्या** | **अनुदान रु. लक्ष** |
| १ | २०१६-१७ | खादी व ग्रामोद्योग आयोग | ३ | २३.११ | १ | ८.११ |
| | | महाराष्ट्र खादी ग्रामोद्योग मंडळ | ३१ | ९६.८६ | १२ | २७.०९ |
| | | जि. उ. केंद्र | ४३ | ९३.५१ | १५ | २५.५७ |
| | | **एकुण** | **७७** | **२१३.४८** | **२८** | **६०.७७** |
| २ | २०१७-१८ | खादी व ग्रामोद्योग आयोग | २ | ८.७५ | २ | १५.०० |
| | | महाराष्ट्र खादी ग्रामोद्योग मंडळ | ५ | ७.५२ | ९ | ३४.१६ |
| | | जि. उ. केंद्र | ५ | ५.९१ | १४ | २८.५८ |
| | | **एकुण** | **१२** | **२२.१८** | **२५** | **७७.७४** |

*सन २०१६-१७ मधील मंजूर प्रलंबित प्रकरणापैकी वाटप प्रक्ररणे

(४) सन २०१७-१८ वर्षासाठी महाराष्ट्र राज्यासाठी एकुण २४५२ प्रकल्प व ४८६४.६३ लक्ष मार्जिन मनी चे उद्दीष्ट केंद्र शासनाने दिलेले आहे. जळगाव जिल्हयाकरीता तीनही अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणांना मिळून सन २०१७-१८ करीता ९० प्रकल्पांचे भौतिक उद्दीष्ट व १७७.५० लक्ष रुपयांचे आर्थिक लक्षांक असून ४७० लाभार्थ्यांचे अर्ज ऑनलाईन द्वारे संकेतस्थळावर प्राप्त झालेले आहेत. सदर उद्दीष्ट पूर्ततेबाबतची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

---

## कणकवली (जि.सिंधुदुर्ग) तालुक्यातील टाळंबा धरणा प्रकल्पग्रस्तांना जमिनीचा मोबदला मिळण्याबाबत

**(३८) २९९१७ (१५-०४-२०१७). श्री.नारायण राणे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कणकवली (जि. सिंधुदुर्ग) तालुक्यातील टाळंबा धरणाची उंची कमी करुन नव्याने निविदा मागविल्या जाणार आहेत, तसेच वनसंज्ञा जमिनीचा मोबदला प्रकल्पग्रस्तांना दिला जाणार असल्याचे शासनाने जाहीर केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत निविदा प्रक्रिया पूर्ण झाली आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०८-०८-२०१७) :** (१) नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अंबरनाथ (जि.ठाणे) येथे शासकीय भूखंड वितरीत केलेल्या गृहनिर्माण संस्थांवर प्रशासक नेमण्याबाबत

**(३९) ३००७४ (१५-०४-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अंबरनाथ (जि.ठाणे) येथे शासकीय भूखंड वितरीत करण्यात आलेल्या गृहनिर्माण संस्थांमध्ये कायद्यानुसार आवश्यक सभासद संख्या नसतानाही बोगस सभासदांना सहभागी करुन अनधिकृत बांधकामे करणे, नियमबाहय सहयोगी सभासद करुन घेणे, रोखीने देणग्या घेणे अशा प्रकारच्या तक्रारी सहकार विभागाकडे करण्यात आल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कायदेशीर सभासद संख्या नसलेल्या किती गृहनिर्माण संस्था आहेत व अशा गृहनिर्माण संस्थांवर प्रशासक नेमण्याबाबत सहकार खात्याकडे विनंती करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरहू तक्रारींबाबत संबंधित संस्थांवर काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देशमुख (०४-०८-२०१७) :** (१) होय.
(२) व (३) अंबरनाथ येथील उत्कर्ष गृहनिर्माण सहकारी संस्था लि.ही अशाप्रकारची एक गृहनिर्माण सहकारी संस्था असून या संस्थेवर प्रशासक नेमण्याबाबत विनंती करण्यात आली होती. सदर संस्थेवर जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे यांच्या दिनांक १६/०६/२०१७ रोजीचे आदेशान्वये प्रशासकाची नियुक्ती करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विद्यार्थी वसतिगृहात खेळाडू विद्यार्थ्यांना प्रवेश देण्याबाबत

**(४०) ३०१९२ (१२-०४-२०१७). श्री.विक्रम काळे, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात अष्टपैलू खेळाडू तयार होण्यासाठी जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी उपलब्ध असलेल्या विद्यार्थी वसतिगृहात खेळाडू विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यासंबंधी शासनस्तरावरुन कोणता निर्णय घेण्यात आला वा येत आहे,
(२) असल्यास, शासनाने घेतलेल्या निर्णयाचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी कोणताच निर्णय घेतला नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०२-०८-२०१७) :** (१) राज्यात ११ क्रीडा प्रबोधिनीमध्ये एकूण १८ क्रीडा प्रकार, जिल्हा क्रीडा संकुलामध्ये मुला-मुलींचे वसतिगृह (८० बेडसह) इ. अत्यावश्यक बाबींचा समावेश केलेला आहे.
(२) क्रीडा प्रबोधिनीत शासन निर्णय दिनांक १८ नोव्हेंबर, १९९५ अन्वये बॅटरी ऑफ टेस्टद्वारे वय वर्ष ८ ते १४ वयोगटातील निवडलेली मुले-मुलीं तसेच ज्या खेळाडूंना राज्यस्तरावर प्राविण्य व राष्ट्रीय स्तरावर सहभाग असेल अशा खेळाडूंमधून सरळ प्रवेश प्रक्रिये अंतर्गत निवडलेली मुले-मुली यांना प्रवेश देण्यात येतो.

क्रीडा विभागाद्वारे तालुकास्तर, जिल्हास्तर, विभागास्तर, राज्यस्तर, राष्ट्रीयस्तर, शालेय, ग्रामीण, महिला क्रीडा स्पर्धांचे आयोजन करताना स्पर्धेदरम्यान खेळाडूंच्या निवासाची व्यवस्था संबंधित जिल्हा व विभागीय क्रीडा संकुलाच्या वसतिगृहामध्ये करण्यात येते.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मोखाडा तालुक्यात (जि.पालघर) अल्प प्रमाणात रोजगार हमीची कामे सुरु असल्याबाबत

**(४१) ३०२९५ (१७-०४-२०१७). श्री.विक्रम काळे, श्री.हेमंत टकले, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मोखाडा तालुक्यात (जि.पालघर) अल्प प्रमाणात रोजगार हमीची कामे सुरु असल्याचे माहे फेब्रुवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने तालुक्यातील गोरगरिब लोक स्थलांतर होऊ नयेत व त्यांना रोजगार उपलब्ध व्हावा म्हणून रोजगार हमी योजनेची

कामे करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. जयकुमार रावल (०४-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

मोखाडा तालुक्यात माहे जानेवारी व फेब्रुवारी, २०१७ मध्ये ग्रामपंचायतीमार्फत एकूण २७८ कामे हाती घेण्यात आलेली होती. सदर कामांवर ३०६४८ इतकी मनुष्यदिन निर्मिती झालेली आहे. तसेच इतर यंत्रणांमार्फत एकूण १८३ कामे हाती घेण्यात आलेली होती. सदर कामांवर १४९५५ इतकी मनुष्यदिन निर्मिती झालेली आहे. त्याचप्रमाणे मोठ्या प्रमाणावर शेल्फवर कामे उपलब्ध करुन देण्यात आली आहेत.
(२) मजुरांचे स्थलांतर रोखण्याच्या दृष्टीने मागेल त्याला रोजगार उपलब्ध करुन देण्यात येतो. त्यामुळे चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अंबरनाथ (जि.ठाणे) शहरात क्षयरोग रुग्णांच्या वाढत्या संख्येला प्रतिबंध घालण्याबाबत

**(४२) ३०३४५ (१५-०४-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अंबरनाथ (जि.ठाणे) शहरात एक-दोन वर्षात क्षयरोगाच्या रुग्णांमध्ये मोठया प्रमाणात वाढ झाली असून ही संख्या ६३५ हून अधिक वाढल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या आजाराला आळा घालण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२८-०७-२०१७) :** (१) हे खरे आहे.

अंबरनाथ (जि.ठाणे) शहरात आढळून आलेल्या क्षयरुग्णांची संख्या खालीलप्रमाणे आहे.

| अंबरनाथ शहर | सन २०१५ | सन २०१६ | माहे जून, २०१७ अखेर |
|---|---|---|---|
| आढळून आलेले रुग्ण | ५७१ | ६५० | ३३० |

(२) राज्यात सर्व जिल्हा व महानगरपालिकांमध्ये सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रम राबविण्यात येतो.

क्षयरोगावर नियंत्रण करण्याकरिता खालीलप्रमाणे विविध उपाययोजना राबविण्यात येतात.

- सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत संशयीत रुग्ण शोधण्याचे काम आरोग्य कर्मचारी व वैद्यकीय अधिकारी यांच्यामार्फत करण्यात येते.
- संशयीत रुग्णांचे थुंकी नमुने तपासले जातात.
- थुंकीदुषीत रुग्ण आढळल्यास त्याला त्वरीत उपचाराखाली आणले जाते.
- क्षयरुग्णांच्या उपचारासाठी नियमित पाठपुरावा केला जातो.
- सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत खाजगी वैद्यकीय व्यवसायिकांचा सहभाग घेण्यात येतो.
- सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत क्षयरोगाबाबत विविध जनजागृती कार्यक्रम राबविण्यात येतात.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर जिल्हयात विशेषज्ञांची मंजूर रिक्त पदे भरण्याबाबत

**(४३) ३०४९५ (१५-०४-२०१७). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्हयात विशेषज्ञांची ३७३ मंजूर पदे असताना केवळ १३५ पदे भरण्यात आली आहेत त्यामुळे जिल्हयातील नागरिकांना अनेक वर्षापासून वैद्यकीय सेवा वेळेत मिळत नसल्याने नागरिकांची गैरसोय होत असल्याचे माहे फेब्रुवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नागरिकांची गैरसोय दूर करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२०-०७-२०१७) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिपत्याखालील नागपूर येथील विविध शासकीय वैद्यकीय महाविद्यालय तसेच रुग्णालयासाठी चिकित्सालयीन/अचिकित्सालयीन विषयातील मंजूर प्राध्यापक ७३ पैकी ११ पदे, सहयोगी प्राध्यापक १८५ पैकी १६ पदे व सहायक प्राध्यापक २७६ पैकी ३९ पदे सद्य:स्थितीत रिक्त आहेत. उक्त संवर्गातील रिक्त पदे प्राथम्याने भरण्याची कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच या संवर्गातील सरळसेवेने भरावयाची पदे पुढील आदेश होईपर्यंत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतून वगळून सदर पदे शासन निर्णय दिनांक १५/०७/२०१४ अन्वये तयार करण्यात आलेल्या विभागाच्या अ.मु.स./प्र.स./सचिव यांचे अध्यक्षतेखालील निवडमंडळातर्फे भरण्याचा शासन निर्णय दिनांक ०९/०२/२०१७ अन्वये निर्णय घेण्यात आला आहे.

---

**मराठवाडयात सिताफळाचे उत्पादन वाढवणेबाबत**

**(४४) ३०५१७ (१५-०४-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **फलोत्पादन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाड्यात विकसित सिताफळांची लागवड करून सिताफळाचे उत्पादन वाढविण्याबाबतचे धोरण शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सिताफळ उत्पादन व सिताफळ प्रक्रिया उद्योग उभारणीसाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (०५-०८-२०१७) :** (१), (२) व (३) सिताफळ लागवडीचे विशिष्ट धोरण शासनाच्या विचाराधीन नाही. तथापि, सिताफळ उत्पादकांच्या अडचणी संदर्भात सिताफळ महासंघ व इतर संबंधित अधिकारी यांच्यासमवेत मा.मंत्री (कृषी व फलोत्पादन) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १०/०१/२०१७ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती.

सन २०१७-१८ साठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत औरंगाबाद विभागासाठी ६६० हेक्टर व लातूर विभागासाठी ८०० हेक्टर सिताफळ लागवडीचा लक्षांक देण्यात आलेला आहे.

सिताफळाचा गर अतिशीत तापमानात गोठवणे, त्याचा वापर पेय, जेली, नैसर्गिक आईस्क्रीम इत्यादी करीता करणे, याबाबत CFTRI या केंद्रीय संस्थेशी संपर्क साधण्यात आला आहे.

---

## राज्य शिक्षण विभागाच्या यू डाइस या अहवालानुसार मुंबईतील मराठी शाळांतील विद्यार्थ्यांची पटसंख्या वाढविण्याबाबत

**(४५) ३०६३० (१२-०४-२०१७). नारायण राणे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शिक्षण विभागाच्या यू डाइस या अहवालानुसार मुंबईतील मराठी शाळांतील विद्यार्थी संख्या गेल्या वर्षीच्या तुलनेत १५ हजारांनी कमी झाली असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अहवालाची दखल घेवून मराठी माध्यमांच्या शाळांत विद्यार्थी पटसंख्या वाढावी यासाठी कोणत्या उपाययोजना केल्या वा करण्यात येत आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (११-०८-२०१७) :** (१) होय.

(२) राज्य शासनाकडून मराठी शाळेतील अस्तित्व टिकविण्यासाठी ज्या उपाययोजना राबविल्या जातात, त्या सर्व उपाययोजना मुंबई महानगरपालिकेतर्फे राबविल्या जात आहेत. प्रत्येक शाळेत शाळा व्यवस्थापन समितीच्या माध्यमातून शाळेच्या परिसरातील पालकांचे मराठी भाषेविषयी समुपदेशन केले जात आहे. तसेच बृहन्मुंबई महानगरपालिका शिक्षण विभागाकडून मराठी शाळांचा दर्जा वाढविण्यासाठी १५७ मराठी शाळांमध्ये “शाळा सुधार प्रकल्प” हा उपक्रम सुरु केला आहे. तसेच महानगरपालिकेच्या

शाळांमध्ये ज्ञानरचनावाद, अध्यापन शास्त्र पध्दती, विद्यार्थी केंद्रीत व्यवसाय आधारित कार्ड, मराठी शाळेतील विद्यार्थ्यांना प्रेरित करण्यासाठी कविता, कथाकथन, भाषण, वक्तृत्व, निबंध स्पर्धा या प्रकारच्या कार्यक्रमांचे आयोजन केले जाते. त्याचप्रमाणे मनपा अखत्यारीतील खाजगी अनुदानित मराठी शाळांमध्ये मराठी भाषा आणि इंग्रजी भाषा या समतुल्य आहेत याची जनजागृती शाळा व्यवस्थापन समिती तसेच संस्था, शालेय व्यवस्थापन आणि स्वयंसेवी संस्थांमार्फत प्रयत्न सुरु आहेत.

(३) प्रश्न उदभवत नाही.

---

## माहूर आणि भोकर (जि.नांदेड) याठिकाणी अनधिकृत तपासणी नाके परिवहन विभागामार्फत सुरू असल्याबाबत

**(४६) ३०७०३ (१५-०४-२०१७). श्री.अमरनाथ राजूरकर** : सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य परिवहन विभागाने राज्यात एकुण २२ तपासणी नाके मंजूर असून त्यापैकी नांदेड जिल्ह्यातील देगलूर आणि बिलोली या दोन तपासणी नाक्याना शासनाने मंजूरी असतांना मागील अनेक वर्षापासून माहूर आणि भोकर याठिकाणी अनधिकृत तपासणी नाके परिवहन विभागामार्फत सुरु असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (२७-०७-२०१७) :** (१) व (२) नांदेड जिल्ह्यातून आंध्रप्रदेशात जाणाऱ्या महामार्ग क्र. २४१ व राज्य रस्ता क्र. २०४ या रस्त्यावर आंतरराज्य वाहतूक करणारी वाहने ये-जा करीत असल्याने या रस्त्यावरही वाहन तपासणीची गरज लक्षात घेऊन, भोकर-निर्मल रस्त्यावर रहाटी (बु.) येथे व माहूर जवळ वाईबाजार येथे वाहन तपासणीची अस्थाई

व्यवस्था केली होती. सदर ठिकाण हे तपासणी नाके नसून, वाहन तपासणीचे चेकपॉईंट आहेत. सदरहू व्यवस्था दिनांक ३१/०१/२०१७ पासून बंद करण्यात आली आहे. प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड यांनी सदर मार्गावरील वाहनांची तपासणी करण्यासाठी वायुवेग पथकास सूचना दिलेल्या आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## केसापुरी कॅम्प (ता.माजलगाव, जि.बीड) येथे पोलीस अधिकारी कार्यालय व कर्मचारी निवासस्थानाची दुरवस्था झाल्याबाबत

**(४७) ३०७९५ (१५-०४-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केसापुरी कॅम्प (ता.माजलगाव, जि.बीड) येथे पोलीस अधिकारी कार्यालय व कर्मचारी निवासस्थानाचे काम निकृष्ट दर्जाचे झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने निवासस्थानाचे निकृष्ट काम करणाऱ्या ठेकेदार व संबंधित अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१९-०८-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पटवर्धन कुरोली (ता.पंढरपूर, जि.सोलापूर) येथील भीमा नदीवरील कोल्हापूर पद्धतीच्या बंधाऱ्याच्या दुरवस्थेबाबत

**(४८) ३०८७८ (२९-०४-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे पटवर्धन कुरोली (ता.पंढरपूर, जि.सोलापूर) येथील भीमा नदीवरील कोल्हापूर पद्धतीच्या बंधाऱ्यामुळे पटवर्धन कुरोली, आव्हे, पिराची कुरोली, तरटगाव, खळवे या गावातील सुमारे १००० हे. क्षेत्र ओलिताखाली आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर बंधाऱ्याचे दरवाजे पूर्ण गंजलेले आहेत तसेच , हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर बंधाऱ्यातील दरवाजातून मोठ्या प्रमाणात पाण्याची गळती होत असल्यामुळे स्थानिक नागरिकाकडून वारंवार नवीन पद्धतीचे दरवाजे बसविणेबाबत मागणी केली जात आहे, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर बंधाऱ्यावर नवीन पद्धतीचे दरवाजे बसविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०३-०८-२०१७) :** (१) होय.
(२) होय.
(३) होय.
(४) सदर बंधाऱ्यावर नविन बर्गे तयार करण्याचे काम यांत्रिकी संघटनेस देण्यात आलेले आहे. यांत्रिकी विभागाच्या संघटनेकडून ५७४ बर्गे प्राप्त झालेले आहेत. या बर्ग्यांचा वापर करुन बंधाऱ्यात सन २०१७ मध्ये पूर्ण क्षमतेने पाणी अडविणे नियोजित आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ आणि राज्य विकास संस्था यांचे विलीनीकरण करण्याबाबत

**(४९) ३२२६१ (११-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ आणि राज्य विकास संस्था यांचे विलीनीकरण करण्यात येत असून याबाबत महाराष्ट्र सांस्कृतिक आघाडीचे संयोजक डाॅ. श्रीपाद जोशी यांच्या अध्यक्षतेखाली आलेल्या समितीने अहवाल सादर केला असता महत्वपूर्ण शिफारशी व संस्थात्मक पुनर्रचना याबाबत शासनाने कोणताच निर्णय घेतला नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शिफारशींची अंमलबजावणी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०१-०९-२०१७) :** (१) नाही.

(२) राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ या दोन्ही संस्थांचे एकत्रिकरण करणे व्यवहार्य व संयुक्तिक होईल का, याबाबत अभ्यास करून अहवाल सादर करण्याबाबत डॉ.श्रीपाद जोशी यांच्या अध्यक्षतेखाली अशासकीय समिती निर्माण करण्यात आली होती. या दोन्ही संस्थांचे एकत्रिकरण न करता त्यांचे स्वतंत्र अस्तित्व कायम राखले जावे, अशी शिफारस सदर समितीने केली होती. समितीच्या कार्यकक्षेतील सदर शिफारशीनुसार उक्त दोन्ही संस्थांच्या स्थापनेची उद्दिष्ट्ये लक्षात घेता दोन्ही संस्थांचे एकत्रिकरण करणे योग्य होणार नाही असा निर्णय शासनाने घेतला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**शीव-पनवेल महामार्गावरील दिवे रात्रीच्या वेळी बंद असल्याबाबत**

**(५०) ३३७९४ (०७-०८-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई व नवी मुंबईला जोडणाऱ्या शीव-पनवेल महामार्गावरील खड्डयांबरोबरच आता वाहनचालकांना उड्डाण पुलावरील दिवे बंद असल्याने

अनेक समस्यांना सामोरे जावे लागत असल्याचे दिनांक १९ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त महामार्गावर पिवळया रंगाचे दिवे सुरु करण्यात आले होते पण सदरहू दिवे दिवसा सुरु व रात्रीच्या वेळी बंद असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (०४-०९-२०१७) :** (१), (२) व (३) होय.

सदर रस्ता खाजगीकरणांतर्गत उद्योजक मे.सायन पनवेल टोलवेज प्रा.लि. यांना देण्यात आला असून त्याअन्वये रस्त्यांची व पथदिव्यांची देखभाल दुरुस्ती करण्याची जबाबदारी उद्योजकाची आहे. परंतु ती उद्योजक वेळेवर करत नसल्याने ही दुरुस्ती उद्योजकाच्या जबाबदारी व खर्चाने (Risk & Cost) खात्यामार्फत करण्याची कार्यवाही हाती घेण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**नागपूर.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, नागपूर.